**सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२१ मधून (प्रतिक्षायादी क्र. १ मधून) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी विहित मुदतीत रूजू न झालेल्या उमेदवारांचे नियतवाटप रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एएससी १४२२/प्र.क्र. २३०/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२७९४१७२.
दिनांक : २० जुलै, २०२३.

**वाचा:-** १) म.लो.आ. चे क्र. १४४२ (२) (१)/२०२१/२३, दि. ०८-१२-२०२२ रोजीचे पत्र.
२) या विभागाचे समक्रमांकाचे दि. २३-०१-२०२३ चे ज्ञापन.
३) सा.प्र.वि., शासन परिपत्रक क्र. मलोआ १११९/प्र.क्र.११५/८, दि.०२-०८-२०१९.
४) या विभागाचे समक्रमांकाचे दि. ३१-०३-२०२३ रोजीचे पत्र.
५) म.लो.आ.चे क्र. १४४२ (२) (१)/२०२१/२३, दि. १७-०५-२०२३ चे पत्र.
६) या विभागाचे समक्रमांकाचे दि. ३१-०५-२०२३ चे ज्ञापन.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित गट-ब मुख्य परीक्षा-२०२१ या परीक्षेतील सहायक कक्ष अधिकारी संवर्गाच्या १०० पदांसाठी दिनांक ३१-०७-२०२२ रोजी घेण्यात आलेल्या मुख्य परिक्षेचा अंतिम निकाल दि. ०६-१२-२०२२ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केला आहे. सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ०८-१२-२०२२ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या १०० उमेदवारांचे, या विभागाच्या संदर्भाधिन क्र. २ येथील दि. २३-०१-२०२३ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले होते. नियतवाटप करण्यात आलेल्या १०० उमेदवारांपैकी २९ उमेदवारांनी विहित मुदतीत नियुक्ती स्विकारली नाही. सदर २९ उमेदवारांऐवजी महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित गट-ब मुख्य परीक्षा-२०२१ मधून प्रतिक्षायादीतून नव्याने २९ उमेदवार उपलब्ध करून देण्याची विनंती संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. ३१-०३-२०२३ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास करण्यात आली होती.

त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र. ५ येथील दि. १७-०५-२०२३ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित गट-ब मुख्य परीक्षा-२०२१ मधून (प्रतिक्षायादीतून) २९ उमेदवारांची मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्याकरिता शिफारस केली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार या विभागाच्या संदर्भाधिन क्र. ६ येथील दिनांक ३१-०५-२०२३ च्या ज्ञापनान्वये सदरहू २९ उमेदवारांचे मंत्रालयीन विभागात नियतवाटप करण्यात आले आहे. सदर ज्ञापनान्वये उमेदवारांना नियुक्तीचा स्विकार करण्यासाठी दि. ३०-०६-२०२३ पर्यंत मुदत देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०२-०८-२०१९ च्या शासन परिपत्रकानुसार नियुक्ती आदेशात नमूद केलेल्या ३० दिवसाच्या मुदतीत उमेदवार रूजू न झाल्यास किंवा विहित कालावधीत रूजू होण्यासाठी मुदतवाढ देण्याची विनंती न केल्यास किंवा विहित वाढीव कालावधीत उमेदवार रूजू न झाल्यास नियुक्ती प्राधिकारी यांनी संबंधित उमेदवाराची नियुक्ती रद्द करण्याचे आदेश निर्गमित करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे.

३. दि. ३१-०५-२०२३ च्या ज्ञापनान्वये नियतवाटप करण्यात आलेल्या २९ उमेदवारांपैकी एका उमेदवाराने विहित मुदतीत नियुक्तीचा स्विकार करण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत या विभागाकडे अर्ज सादर केलेला आहे. सदर उमेदवाराने त्यांच्या अर्जात नमूद केलेली कारणे तसेच "महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१" मधील तरतुदीनुसार सदर उमेदवाराला नियतवाटप केलेल्या विभागात रूजू होण्यासाठी मुदतवाढ देण्यात आलेली आहे. तथापि अन्य २८ उमेदवारांनी दि. ३०-०६-२०२३ पर्यंत संबंधित विभाग/कार्यालयात व्यक्तिश: उपस्थित राहून नियुक्ती स्विकारणे आवश्यक होते. तथापि, नियतवाटप करण्यात आलेल्या २८ उमेदवारांपैकी १७ उमेदवारांनी नियुक्ती स्विकारली नाही.

४. सबब, संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार संदर्भाधिन क्र. ६ येथील दि. ३१-०५-२०२३ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी विहित कालावधीत रूजू न झालेल्या सोबतच्या विवरणपत्र "अ" मधील उमेदवारांचे नियतवाटप रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०७२०१२१०३३८५०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.07.20 12:13:25 +05'30'

**(वि.बा. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-** संबंधित उमेदवार (सोबतच्या विवरणपत्र "अ" प्रमाणे) (ई मेल व्दारे)

**प्रत :-**

१) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग.
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, त्रिशूल गोल्ड फिल्ड, प्लॉट नंबर ३४, सरोवर विहार समोर, सेक्टर ११ सीबीडी बेलापूर, नवी मुंबई-४००६१४.
३) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १४-अ) (संग्रहार्थ)

## सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२१ मधून (प्रतिक्षायादी क्र. १ मधून) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी विहित मुदतीत रूजू न झालेल्या उमेदवारांची नियुक्ती रद्द करण्याबाबत.

## सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र.एएससी १४२२/प्र.क्र.२३०/१४-अ,

## दिनांक : २० जुलै, २०२३ सोबतचे (विवरणपत्र "अ")

| अ.क्र. | म.लो.आ शिफारस क्रमांक (प्रतिक्षायादीतील) | Name | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ शिफारस प्रवर्ग | विभागाचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | More Nikhil Gangandhar | EWS | OPEN-General-WT-२ | विधि व न्याय विभाग |
| २ | ३ | Vijay Nagnath Lamkane | Unreserved | OPEN-General-WT-३ | आदिवासी विकास विभाग |
| ३ | ४ | Patil Vishwajeet Vijay | EWS | EWS-General-WT-१ | गृह विभाग |
| ४ | ५ | ADSUL DADASAHEB VIJAYKUMAR | EWS | EWS-General-WT-२ | नियोजन विभाग |
| ५ | ७ | Mane Jagdish Jalindar | EWS | EWS-General-WT-४ | सामान्य प्रशासन विभाग |
| ६ | १० | SAMBARKAR DEVLING TUKARAM | OBC | OBC-General-WT-३ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ७ | ११ | KANDE VIDYA ANKUSH | NT-D | OPEN-Female-WT-१ | ग्राम विकास विभाग |
| ८ | १२ | PATIL SAYALI VISHWANATH | EWS | OPEN-Female-WT-२ | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ९ | १३ | KADAM MANISHA NYANU | EWS | OPEN-Female-WT-३ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| १० | १७ | NIRMAL MAYURI JALINDAR | OBC | OBC-Female-WT-२ | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ११ | १९ | KHANDARE VISHWAJIT ASHOKRAO | SC | SC-General-WT-२ | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| १२ | २२ | BAMANE NAGESHA RAMU | SC | SC-General-WT-५ | दिव्यांग कल्याण विभाग |
| १३ | २३ | SHINGANKAR ANIKET OMPRAKASH | SC | SC-General-WT-६ | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| १४ | २४ | GODE VRUSHALI JIJABHAU | ST | ST-Female-WT-१ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| १५ | २५ | BHOYAR GULSHAN DASHRATH | ST | ST-General-WT-१ | विधि व न्याय विभाग |
| १६ | २६ | WANTEKAR SANJEEVANI GANGADHAR | ST | ST-Female-WT-२ | कृषि व पदुम विभाग |
| १७ | २७ | PAGALWAD LAXMI BABURAO | ST | ST-Female-WT-३ | सामान्य प्रशासन विभाग |